**सन २०१८-१९ करिता राज्य योजनेतंर्गत "संशोधन केंद्र आणि प्रायोगिक चाचण्या व क्षेत्रविषयक चाचण्या" (४४१५००११) या योजनेचा चालू बाब प्रस्ताव.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१८/प्र.क्र.६७ /फ-२**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक :- २५ जुन, २०१८**

वाचा :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.४७/(१८-१९)/३५५, दि.०१.०६.२०१८.

**प्रस्तावना :-**

सन २०१८-१९ करिता "संशोधन केंद्र आणि प्रायोगिक चाचण्या व क्षेत्रविषयक चाचण्या" (४४१५००११)" या योजनेकरिता एकूण रु.७५.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पित निधीच्या अनुषंगाने रु.७५.०० लक्ष रक्कमेचा चालुबाब प्रस्ताव संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला असून प्रस्तावांतर्गत निधी वितरीत करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

२. वित्त विभागाच्या दि.०२.०४.२०१८ रोजीच्या परिपत्रकान्वये, सन २०१८-१९ करिता भांडवली खर्च शीर्षातर्गत योजनांकरिता प्रथम नऊमाहीकरीता डिसेंबर, २०१८ अखेर आवश्यक असणारा कार्यक्रमावरील खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७० % च्या मर्यादेत सदर प्रणालीद्वारे (बीम्स) वितरीत केला आहे. त्याअनुषंगाने, संदर्भ क्र.२ येथील दि.०१.०६.२०१८ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव विचारात घेता "संशोधन केंद्र आणि प्रायोगिक चाचण्या व क्षेत्रविषयक चाचण्या" (४४१५००११)" या लेखाशीर्षाअंतर्गत वित्त विभागाच्या सुचनांनुसार एप्रिल ते डिसेंबर या नऊ महिन्यांच्या कालावधीकरीता **रु.५२.५० लक्ष (०२, मजुरी-रु.३१.५० लक्ष व २१ पुरवठा व सामग्री - रु.२१.०० लक्ष)** इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. मागील वर्षी सदर योजनेकरिता वितरित केलेल्या निधीच्या विनयोगाबाबतचे प्रमाणपत्र सादर केले जाईल याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ वरील दि.०२.०४.२०१८ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तीची पूर्तता करण्यात येईल याची देखिल दक्षता घ्यावी.

४. सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र. सी-१०, प्रधान शिर्ष - ४४१५, कृषि संशोधन व शिक्षण यावरील भांडवली खर्च, ०६ वनीकरण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनेतंर्गत योजना, ००४ संशोधन, (००)(०१) संशोधन केंद्र आणि प्रायोगिक चाचण्या व क्षेत्रविषयक चाचण्या (राज्य) (४४१५००११) या लेखा शिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दि.०२.०४.२०१८ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ मधील भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२५१७१२२६९४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b8040551 4f23a879132aeec, serialNumber=f0d5ee4c99cc9cbfa8761b3ddc7bd6650bad33302f33a 35400ad5aad2291371a, cn=Atul Ashok Kode
Date: 2018.06.25 17:15:35 +05'30'

**(अतुल कोदे)**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) मुख्य वनसंरक्षक (संशोधन), महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
५) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
६) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
९) जिल्हा कोषागार अधिकारी नागपूर / पूणे
१०) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
११) निवडनस्ती , फ-२ कार्यासन,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.